**वर्ग-४ मधील कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधीतून रक्कम काढण्यास मंजुरी देण्याच्या अधिकाराचे सह/उपसचिव स्तरावर पुन:प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र. विअवि -२०१६/प्र.क्र.१०७/प्रशा-२,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दि.२१.०७.२०१७

**प्रस्तावना-**

मत्रांलयीन प्रशासनिक विभागामध्ये वर्ग-४ मधील कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधीतील कर्मचाऱ्यांच्या जमा खात्यातून रक्कम काढण्यास मंजूरी देण्यासाठीची प्रकरणांवर, भविष्य निर्वाह निधी नियम १६ व २० अन्वये, विभाग प्रमुखांच्या स्तरावर मान्यता घेण्यात येते. विभागाच्या स्थापनेपासून सदरचे अधिकार प्रशासनिक विभागाचे प्रमुख म्हणून प्रधान सचिव/ सचिव यांच्यामार्फत राबविण्यात आलेले आहेत. कामकाजाच्या सुकरतेच्या दृष्टीने सदर नियमातील अटीनुसार प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेले वर्ग-४ मधील कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधीतील कर्मचाऱ्यांच्या जमा खात्यातून विशिष्ट रक्कम काढण्यास मंजूरी देण्याचे अधिकार कार्यालयातील सह/उप सचिव यांना पुन:प्रदान करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

या अनुषंगाने शासन असे आदेश देत आहे की, वर्ग-४ मधील कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधी संदर्भातील प्रकरणात, भविष्य निर्वाह निधी नियम १६ व २० अन्वये, भविष्य निर्वाह निधीतील कर्मचाऱ्यांच्या जमा खात्यातून रू.१,५०,०००/- इतक्या रक्कमेच्या मर्यादेपर्यंत रक्कम काढण्यास मंजूरी देण्याबाबत, अटी व शर्तीच्या अधीन राहून, प्रशासनिक विभागाला प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार प्रभारी सह/उपसचिव यांना पुन:प्रदान करण्यात येत आहेत. संबंधीत सह/सचिव यांनी त्यांना प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांच्या संबंधीत नियम, अटी व शर्ती विचारात घेऊन वित्तीय मंजूरीचे प्रस्ताव त्याच्या स्तरावर निकाली काढावेत.

या पुन:प्रदानानंतर वर्ग-४ मधील कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधीसंदर्भातील प्रकरणात भविष्य निर्वाह निधीतील कर्मचाऱ्यांच्या जमा खात्यातून रू.१,५०,०००/- इतक्या रक्कमेपेक्षा अधिक रक्कम असलेल्या प्रकरणात विभाग प्रमुखाचे मंजूरी देण्याचे अधिकार अबाधीत राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा सांकेतांक. २०१७०७२११७२७०८६११० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्याचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Meghashyam B Nawar

Digitally signed by Meghashyam B Nawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=IEL Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7d2d0d7e2120f3814eff2bd1a5d3c902860ebecbe995c3b2260a01b762f45c3a, serialNumber=a5505efe2f8776471817f30ce3446f37d84d8aedd35d8e3a76a12d1b08434dd, cn=Meghashyam B Nawar
Date: 2017.07.21 17:24:24 +05'30'

**(मेघःश्याम नवार)**
कक्ष अधिकारी

**प्रति,**

१. मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर,
५. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
६. संबंधीत सह/उप सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
७ सर्व मंत्रालयीन विभाग,
८ वित्त विभाग (व्यय-४/अथसंकल्प-१४/विनियम)
९ सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१० उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग/ सर्व कार्यासने
११ मा. विरोधी पक्षनेते, महाराष्ट्र विधानसभा/ विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
१२ निवड नस्ती, प्रशासन-२, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई